**<u>रास्तभाव दुकानांच्या प्रभावी तपासण्याबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक : अशिदु-१३१९/प्र.क्र.०८/नापु-३१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १७ जानेवारी, २०१९.

<u>वाचा</u>:- १) शासन निर्णय क्र.: साविव्य -१०९१/२४/प्र.क्र.६१७८/नापू-२८, दि.१२.११.१९९१
२) शासन परिपत्रक क्र.: साविव्य -१०९२/प्र.क्र.६४९०/नापू-२८, दि.२७.०५.१९९२
३) शासन परिपत्रक क्र.: साविव्य -१०१९/प्र.क्र.८५९९/नापू-२८, दि.१७.०४.२००१
४) शासन निर्णय क्र.: साविव्य -२००४/प्र.क्र.१७३२/नापू-२८, दि.१९.४.२००५

**<u>शासन परिपत्रक:-</u>**

सन २०१७-१८ च्या ३८ व्या अहवालात लोकलेखा समितीच्या स्वस्त धान्य दुकानांची आणि शिधापत्रिकांची अपर्याप्त किंवा सदोष तपासणी असल्याचे समितीच्या निदर्शनास आल्यामुळे याबाबत काही शिफारशी केलेल्या आहेत. रास्तभाव दुकाने आणि शिधापत्रिकांच्या तपासणीबाबत मानके निश्चित करण्यात आली आहेत. त्याचबरोबर रास्तभाव दुकानांची तपासणी करण्याची कार्यपध्दती आणि शिधापत्रिका तपासण्याचे प्रमाण इ. बाबत सविस्तर सूचना संदर्भाधीन परिपत्रकान्वये यापूर्वीच करण्यात आल्या आहेत. या सूचनांची गांभिर्याने दखल घेतली जात नाही. यावरून लोकलेखा समितीने याबाबत काही शिफारशी केलेल्या आहेत.

२. लोकलेखा समितीच्या शिफारशी विचारात घेऊन रास्तभाव दुकानांची तपासणी आणि शिधापत्रिकांची तपासणी करण्याबाबत खालीलप्रमाणे सूचना या परिपत्रकान्वये देण्यात येत आहेत :-

१) प्रत्येक दुकानाची सहा महिन्यात कमीतकमी एकवेळा आणि वर्षातून कमीतकमी दोनवेळा तपासणी करण्यात यावी.

२) स्वस्त धान्य दुकाने आणि केरोसीन परवाने, शिधापत्रिका आणि गोदामांची तपासणी यापूर्वी विहित केलेल्या इष्टांकाप्रमाणे व कार्यपध्दतीप्रमाणे करण्यात यावी.

३) आपापल्या कार्यक्षेत्रात विहित केलेल्या इष्टांक व कार्यपध्दतीप्रमाणे स्वस्त धान्य दुकाने/केरोसीन परवाने, शिधापत्रिका आणि गोदामांची तपासणी होत आहे किंवा कसे, याबाबत जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी संनियंत्रण करावे.

४) स्वस्त धान्य दुकाने/केरोसीन परवाने इत्यादींची तपासणी विहित इष्टांक व कार्यपध्दतीप्रमाणे झालेली आहे, याबाबतचा अहवाल संबंधित जिल्हा पुरवठा अधिकारी/ अन्नधान्य वितरण अधिकारी, नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई यांनी स्वत: प्रमाणित करून शासनाकडे दरमहा पुढील महिन्याच्या ५ तारखेपर्यंत सादर करावा.

३. या सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्याची दक्षता घेण्यात यावी.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०११८१०२८२३९८०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Nagappa Chandappa Imade

Digitally signed by Nagappa Chandappa Imade
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Food Civil Supplies and Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8c8889a1f9e9a9ee73d9ef011894f7ad17eb5856e63218598e7f8b9b423349a1, serialNumber=19a4d4d79d3533e917f33e30be7fb33aee65b0315d18be024e91a9b055d1db73, cn=Nagappa Chandappa Imade
Date: 2019.01.18 10:41:06 +05'30'

**( ना. चं. इमडे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.मंत्री (अ.ना.पु. व ग्रा.सं) यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई-३२.
२) मा.राज्यमंत्री (अ.ना.पु. व ग्रा.सं) यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई-३२.
३) प्रधान सचिव (अ.ना.पु. व ग्रा.सं) यांचे स्वीय सहायक, महाराष्ट्र राज्य, मुंबई-३२.
४) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
५) महालेखापाल-१/२ (लेखापरिक्षा) मुंबई/नागपूर.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखापरिक्षा, मुंबई.
८) सर्व विभागीय आयुक्त.
९) सर्व उप आयुक्त (पुरवठा).
१०) सर्व जिल्हाधिकारी/जिल्हा पुरवठा अधिकारी/अन्नधान्य वितरण अधिकारी.
११) नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई.
१२) वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
१३) निवडनस्ती (नापु-३१).